शासकीय वाहनांचा खाजगी कामासाठी वापर व त्याकरिता करावयाची भाडे आकारणी.

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग,
शासन निर्णय क्रमांक प्रवास-१०८७/प्र.क्र.१८१/९०/सेवा-५,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक १५ नोव्हेंबर १९९०.

पहा :- (१) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक टीआरए-१०८१/प्र.क्र.१६४६/एसईआर-५, दिनांक २० नोव्हेंबर १९८१.

(२) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक प्रवास-१०८७/प्र.क्र.४६४/८७/सेवा-५, दिनांक १७ ऑगस्ट १९८८.

शासन निर्णय :- शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक प्रवास-१०८७/प्र.क्र.४६४/८७/सेवा-५, दिनांक १७ ऑगस्ट १९८८ अन्वये शासकीय वाहने अभिहस्तांकित करण्याची पध्दती बंद करण्यात आलेली असून, पूर्वी ज्या अधिका-यांना शासकीय वाहने अभिहस्तांकित केलेली होती, परंतु ज्यांनी वाहनाच्या इंधनावरील खर्च व वाहन चालकाचे वेतन व भत्ते यांवरील खर्च स्वत: न सोसता, शासनाने सोसला असेल, त्यांच्या बाबतीत अशा अभिहस्तांकिती अधिका-यांकडून दर किलोमीटरला १ (एक) रु. या दराने, वाहनाच्या खाजगी वापरासाठीची वसुली करण्यात यावी, असे निदेश देण्यात आलेले आहेत. अशा अधिका-यांनी विहित दराने मासिक शुल्क रु. १५०/- अदा केलेले असल्यास, ही रक्कम त्यांच्याकडून खाजगी वापरासाठी करावयाच्या वसुलीत वळती केली जावी किंवा काय असा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. शासन या बाबतीत असा आदेश देत आहे की, अभिहस्तांकिती अधिका-यांनी इंधन व वाहन चालकाचे वेतन व भत्ते यांवरील खर्च स्वत: सोसला नसला, तरी त्यांच्याकडून शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक प्रवास-१०८७/प्र.क्र.४६४/८७/सेवा-५, दिनांक १७ ऑगस्ट १९८८ परिच्छेद ३ अनुसार, १ रु. प्रति किलोमीटर, या दराने वसुली करताना, ती अधिका-याने शासनाकडे अदा केलेल्या मासिक शुल्क रु. १५०/- शी समायोजित केली जावी. थोडक्यात अशा अधिका-यांकडून १५० कि.मी. पेक्षा अधिक खाजगी प्रवासासाठीच रु. १ प्रति कि.मी. या दराने दिनांक १७ ऑगस्ट १९८८ पर्यन्तच्या खाजगी वापरासाठी वसुली करण्यात यावी व त्यानंतरच्या खाजगी वापरासाठी दिनांक १७ ऑगस्ट १९८८ च्या आदेशातील परिच्छेद ४ प्रमाणे वसुली करण्यात यावी.

२. शासन असाही आदेश देत आहे की, ज्या अधिका-यांनी अभिहस्तांकित वाहनाचा, शासकीय कामासाठी वापर केला असताना शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक टीआरए-१०८१/प्र.क्र.१६४६/एसईआर-५, दिनांक २० नोव्हेंबर १९८१ मध्ये विहित केलेल्या दराने सडक मैल भत्ता घेतला असल्यास, अशा अधिका-यांनी इंधन वगैरे वरील खर्च स्वत: केलेला नसल्याने, तसेच त्यांनी शासनाकडे अदा केलेले मासिक शुल्क, वरील परिच्छेद १, प्रमाणे खाजगी वापरासाठी करावयाच्या दराशी समायोजित करावयाचे असल्यामुळे, प्रवास भत्त्याच्या स्वरूपात शासनाकडून देण्यात आलेली सडक मैल भत्त्याची रक्कम, शासनास परत करावी.



शामुमु-रोटा-विवि-रव-९७०(१२,०००-१०-११-९०)

३. ज्या अधिकाऱ्याने शासकीय वाहनाच्या अभिहस्तांकनाच्या अटीप्रमाणे विहित दराने मासिक शुल्क भरले असेल, इंधन आदींवरील खर्च स्वत: सोसला असेल व शासन निर्णय, दिनांक २० नोव्हेंबर १९८१ मध्ये विहित केलेल्या दराने सडक मैल भत्ता घेऊन ५०० कि. मी. पेक्षा अधिक प्रवासासाठी विहित दराने शुल्क भरले असल्यास, अशा अधिकाऱ्यांची प्रकरणे नव्याने उघडण्यात येऊ नयेत.

४. हे आदेश सार्वजनिक क्षेत्रातील उपक्रम, मंडळे, इत्यादींकडील वाहने व वाहनांच्या, त्यातील अधिकारी व कार्यकारी ह्यांच्याकडून होणाऱ्या वापरासाठीही लागू आहेत. मंत्रालयातील संबंधित प्रशासकीय विभागांनी त्यांच्या नियंत्रणाखाली असलेल्या सार्वजनिक क्षेत्रातील उपक्रम, मंडळे इत्यादींच्या नजरेस हे आदेश आणावेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

मंगला मं. कोरगावकर,
शासनाचे उप सचिव.

प्रति,

मुख्य सचिव,
सर्व अप्पर मुख्य सचिव,
मंत्रालयातील प्रशासकीय विभागांतील सर्व सचिव,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व विभाग प्रमुख,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
उप सचिव, सार्वजनिक उपक्रम कक्ष, वित्त विभाग,
महालेखापाल-१ [लेखा व अनुज्ञेयता], महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-२ [लेखा व अनुज्ञेयता], महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल-१ [लेखापरीक्षा], महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-२ [लेखापरीक्षा], महाराष्ट्र, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
मंत्रालयाच्या सर्व विभागांखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
* प्रबंधक, उच्च न्यायालय [मूळ शाखा], मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय [अपील शाखा], मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली,
जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
वित्त विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती, कार्यासन सेवा-५.

* पत्राने.

९५-२६०[१२, ०००+१०-११-२०]-३